अति-महत्वाच्या / महत्वाच्या व्यक्तींच्या /
अधिका-यांच्या वाहनांवर लाल /अंबर
दिवा अनुज्ञेय करण्याबाबत

## महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक एमव्हीआर ०८१०/प्र.क्र. ५१५/परि-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- ५ मार्च, २०११.

वाचा :- १) शासन निर्णय क्र.एमव्हीआर १३९७ / ९९५ /सीआर ३७/ परि-२ ,
दिनांक ०३ जुलै, १९९७
२) शासन परिपत्रक क्र.एमव्हीआर १३९७ / ९९५ / सीआर ३७ / परि-२,
दिनांक ११ फेब्रुवारी, १९९८
३) शासन निर्णय क्रमांक एमव्हीआर ०८१०/प्र.क्र. ५१५/परि-२
दिनांक :- १७ सप्टेंबर, २०१०.

प्रस्तावना :- लाल/अंबर दिवा सुविधेचा गैरवापर टाळण्यासाठी / या विशयाचे गांभीर्य व अनन्य साधारण महत्व टिकवून ठेवण्याच्या उद्देशाने शासन निर्णय दि.३.७.१९९७ अन्वये अनुज्ञेय लाल/अंबर दिवा सुविधेसाठी गठीत केलेल्या समितीने आढावा घेवून पूर्वीचे सर्व आदेश अधिक्रमीत करुन शासन निर्णय दि. १७.९.२०१० अन्वये सुधारित दिवा अनुज्ञयतेबाबतचे आदेश निर्गमित करण्यांत आले आहेत. तथापि, ही सुविधा अनुज्ञेय करण्यांकरीता महत्वाच्या व्यक्ती, विविध अधिकारी यांच्याकडून सातत्याने शासनास प्राप्त झालेल्या विनंतीच्या अनुषंगाने समितीद्वारे विचारार्थ घेऊन केलेल्या शिफारशीनुसार ही सुविधा अनुज्ञेय करण्याबाबत प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :- दिव्याची सुविधा नव्याने अनुज्ञेय करण्याबाबत समितीने दि.२७.०१.२०११ रोजी अप्पर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित केलेल्या बैठकी अन्वये केलेल्या शिफारशीस अनुसरुन खालीलप्रमाणे लाल/ अंबर दिवा अनुज्ञेय करण्याबाबत याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | लाल दिवा सुविधा अनुज्ञेयता |
|---|---|
| १ | अध्यक्ष /उपाध्यक्ष/सदस्य, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण |
| २ | महानिबंधक, उच्च न्यायालय |
| ३ | अध्यक्ष, मानवी हक्क आयोग |

| अ.क्र. | अंबर दिवा सुविधा अनुज्ञेयता |
|---|---|
| १ | महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय / महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाची (MIDC) / शहर औद्योगिक विकास महामंडळ (CIDCO) या महामंडळाची सर्व अग्निशमन वाहने |
| २ | विभागीय कार्यालयामधील अप्पर आयुक्त |
| ३ | आयुक्त, 'ड' वर्ग महानगरपालिका |
| ४ | १) प्रधान मुख्य वनसंरक्षक व तत्सम दर्जाचे अधिकारी<br>२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व तत्सम दर्जाचे अधिकारी |
| ५ | अध्यक्ष, अनुसुचित जाती / जमाती (अत्याचार प्रतिबंधक ) अधिनियम |
| ६ | सदस्य, मानवी हक्क आयोग |

२. शासन निर्णय गृह विभाग, दि.१७.९.२९१० अन्वये विहित केलेल्या अटी व शर्ती कायम राहतील. त्यामधील अट क्रमांक ११ बाबत परिवहन आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई यांच्यासह मोटार वाहन कायदा, केंद्रीय मोटार वाहन नियम, महाराष्ट्र मोटार वाहन नियमांतर्गत अंमलबजावणी करताना पोलीस विभागाने देखील याबाबत आवश्यक कार्यवाही करुन शासनास नियमितपणे अहवाल सादर करावा.

३. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या (www.maharashtra.gov.in) या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेताक २०११०३०५२११३४०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(ज्यो.मा. चव्हाण )
उप सचिव (परिवहन), गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.राज्यपाल यांचे खाजगी सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
सर्व अप्पर मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
सचिव (परिवहन) यांचे स्वीय सहायक
सचिव (नगर विकास विभाग) यांचे स्वीय सहायक
प्रधान सचिव (महसूल व वन) यांचे स्वीय सहायक
प्रधान सचिव ( राजशिष्टाचार )
सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग (सुधार-१)

मा.निबंधक, मुंबई उच्च न्यायालय
प्रबंधक ,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,फ्री प्रेस जनरल रोड, शासकीय कुटीर क्र.३/४, मुंबई-२१
संचालक, महाराष्ट्र अग्निशामक सेवा संचालनालय, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ,
उद्योग सारथी बिल्डींग, २ रा मजला, अग्निशमन विभाग, महाकाली गुंफा मार्ग, अंधेरी (पूर्व),मुंबई-९३
निबंधक, मानवी हक्क आयोग, मुंबई
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व पोलीस अधिक्षक
परिवहन आयुक्त
सर्व "ड " दर्जा असलेले महानगरपालिका आयुक्त
प्रधान मुख्य वनसंरक्षक
अप्पर पोलीस आयुक्त, (वाहतूक ), मुंबई
निवड नस्ती (परिवहन - २)

----------